सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील विभागीय चौकशीबाबतच्या प्रकरणांचे कामकाज हाताळण्यासाठी सेवानिवृत्त अधिका-यांच्या करार पध्दतीने करण्यात आलेल्या नियुक्तीचे नुतनीकरण करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप्र-२०१६/प्र.क्र.४३९/आस्था-१**
मंत्रालय (विस्तार), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २१ जून, २०१८

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, समक्रमांक, दि.०१.०७.२०१७.
३) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, समक्रमांक, दि.११.०८.२०१७.

**प्रस्तावना:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचा तातडीने निपटारा करण्याच्या अनुषंगाने, दि.०१.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये, राज्य शासनाच्या सेवेतून सेवानिवृत्त झालेल्या श्री. विजयकुमार विष्णू दपके, सेवानिवृत्तीच्यावेळचे पदनाम - अवर सचिव यांची ११ महिन्यांच्या कालावधीसाठी करार पध्दतीने नियुक्ती करण्यात आली होती. सदर नियुक्तीचा कालावधी दि.०६.०६.२०१८ समाप्त झाला आहे. तथापि, त्यांच्या सेवेची शासनास अजूनही आवश्यकता आहे. त्यामुळे, त्यांच्या नियुक्तीचे नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचा तातडीने निपटारा करण्याच्या अनुषंगाने, करार पध्दतीने करण्यात आलेल्या नियुक्तीची शासनास अजूनही आवश्यकता असल्याने, श्री. विजयकुमार विष्णू दपके, सेवानिवृत्तीच्यावेळचे पदनाम - अवर सचिव यांच्या करार पध्दतीने दि.०१.०७.२०१७ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या नियुक्तीचे सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन राहून एक वर्षाच्या कालावधीसाठी नुतनीकरण करण्यात येत आहे.

२. श्री. विजयकुमार विष्णू दपके यांच्या करार पध्दतीने नियुक्तीच्या कालावधीकरिता (दि.०७.०६.२०१८ ते दि.०६.०६.२०१९) मासिक पारिश्रमिक (अन्य भत्त्यांसह) सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ च्या शासन निर्णयानुसार या विभागाच्या दि.११.०८.२०१७ च्या शासन ज्ञापनान्वये निश्चित केल्याप्रमाणे एकुण रु.३८०००/- (रु.अडतीस हजार फक्त) इतके राहील.

३. या प्रकरणी येणारा खर्च मागणी क्र. एन-२, २२५१-सचिवालय-सामाजिक सेवा, ०९०-सचिवालय, (०१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, दत्तमत (२२५१०११३), १३ कार्यालयीन खर्च

या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन त्याखालील सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून तो भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२११४२६५५१८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2018.06.21 14:26:18 +05'30'

(ज्ञा. ल. सुळ)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव
६) सर्व सह / उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ०३२.
७) अवर सचिव (लेखाशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ०३२.
८) श्री. विजयकुमार विष्णू दपके, सेवानिवृत्त अवर सचिव.
९) निवडनस्ती.